**भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंती वर्षानिमित्त १२५ निवडक गांवांतील अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांच्या वस्त्यांचा सर्वांगीण विकास करणे**

**मौजे नवेगांव बांध, ता. अर्जुनी मोरगांव, जि. गोंदिया.**

**महाराष्ट्र शासन**

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन निर्णय, क्रमांक: दवसु-२०१८/प्र. क्र. १८४/अजाक**

मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक: १५ फेब्रुवारी, २०१९.

वाचा :

१. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक: सान्यावि-२०१५/ प्र. क्र.१६३/ बांधकामे, दिनांक ०९ ऑक्टोबर,२०१५.

२. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक: दवसु - २०१६ / प्र. क्र. १५६/ अजाक, दिनांक १२ ऑगस्ट,२०१६.

३. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक: बैठक-२०१८ / प्र. क्र. २५/ अजाक, दिनांक ०६ मार्च, २०१८.

४. आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र,क्रमांक:सकआ / मावक /अजानबौघवि / निअजानबौ / डॉबाआं१२५जयंती / २०१८ / का-१२ /५७५, दिनांक १२ जुलै, २०१८.

**प्रस्तावना:**

**भारतरत्न** डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंती वर्षानिमित्त १२५ निवडक गांवांतील अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांच्या वस्त्यांचा सर्वांगिण विकास करण्याचा निर्णय शासनाने उपरोक्त वाचा २ अन्वये घेतलेला आहे. सदर निर्णयांतर्गत "मौजे नवेगांव बांध, ता. अर्जुनी मोरगांव, जि. गोंदिया" येथील अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांच्या वस्तीचा समावेश उपरोक्त वाचा ३ अन्वये करण्यात आलेला आहे. यास अनुसरून मौजे नवेगांव बांध, ता. अर्जुनी मोरगांव, जि. गोंदिया येथील अनुसूचित जाती व नवबौध्द वस्तीच्या विकासाच्या कामाचा आराखडा नागपूर प्रादेशिक विभागासाठी शासनाकडून निवडण्यात आलेले वास्तुशास्त्रज्ञ यांनी तयार केलेला आहे. सन २०१७-१८ च्या दरसूचिवर आधारित सविस्तर अंदाजपत्रक सहाय्यक अभियंता श्रेणी-I, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, अर्जुनी मोरगांव, जि. गोंदिया यांनी तयार केलेले कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्रमांक २, गोंदिया, अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर तसेच सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्यावतीने प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण विभाग, नागपूर यांनी सांक्षाकित केलेले आहे. सदर सविस्तर अंदाजपत्रक उपरोक्त वाचा ४ अन्वये आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी शासनास पुढील कार्यवाहीस्तव सादर केलेले आहे, सदर सविस्तर अंदाजपत्रक खालीलप्रमाणे :

(रुपये लाखात)

| अ.क्र. | कामाचे नांव | छाननीअंती परिगणित रक्कम रुपये |
|---|---|---|
| १. | Construction of multipurpose Building / CC Road /CC Drain बहुउद्देशीय इमारत/सिमेंट क्रॉक्रीट रस्ता/ सिमेंट क्रॉक्रीट नाली | २४०.८८ |
| | एकूण | २४०.८८ |
| अक्षरी रुपये दोन कोटी चाळीस लक्ष अठ्ठयाऐंशी हजार फक्त | | |

सदर प्रस्तावित कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय:</u>**

भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंती वर्षानिमित्त १२५ निवडक गांवांतील अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांच्या वस्त्यांचा सर्वांगिण विकास करण्याच्या निर्णयास अनुसरुन आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी मौजे नवेगांव बांध, ता. अर्जुनी मोरगांव, जि. गोंदिया येथील अनुसूचित जाती व नवबौध्द वस्तीच्या विकासाचा सादर केलेला उपरोक्त रुपये २४०.८८ लक्ष (अक्षरी रुपये दोन कोटी चाळीस लक्ष अठ्ठयाऐंशी हजार फक्त) च्या सविस्तर अंदाजपत्रकास खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१. काम सुरु करण्यापूर्वी नमूना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच काम सुरु करण्यात यावे.

२. ढोबळ स्वरूपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घेण्यात यावे.

३. प्रत्यक्ष काम करतेवेळी शासन निर्णय, पर्यावरण विभाग, क्रमांक: इएनव्ही-२०१३/प्र.क्र. १७७/तां.क.-१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

४. शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक: बीडीजी-२०१७/प्र.क्र. ६०/ इमारती-२, दिनांक ०७ जुलै, २०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

५. प्रशासकिय मान्यता प्रदान करण्यापूर्वी सदर अंदाजपत्रकास उपभोक्ता विभागाच्यावतीने सक्षम प्राधिकारी म्हणून प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण विभाग, नागपूर यांनी साक्षांकन करणे आवश्यक आहे.

६. नियोजित जागा सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

७. सदर प्रकरणी शासन निर्णय, दिनांक १२ ऑगस्ट, २०१६ मधील इतर अटी परिच्छेदातील अनुक्रमांक ६ नुसार सदर कामे सार्वजनिक बांधकाम विभाग/जिल्हा परिषद बांधकाम विभाग यांच्यामार्फत करण्यात यावीत.

८. उपरोक्त कामे अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांच्या वस्तीतीलच आहेत याची प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण विभाग, नागपूर यांनी खात्री करावी.

९. निधी वितरणाच्या मार्गदर्शक सूचना समाजकल्याण आयुक्त स्तरावरुन देण्यात याव्यात.

२. सदर प्रकरणी होणारा खर्च हा मागणी क्रमांक एन-३, मुख्य लेखाशिर्ष २२२५ अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण, ०१ अनुसूचित जातीचे कल्याण, ०२ भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची १२५वी जयंती साजरी करणे, (०२) (०१) भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची १२५वी जयंती साजरी करणे. (कार्यक्रम), ५३, मोठी बांधकामे, लेखाशिर्ष २२२५ डी ८२३ याखाली खर्ची घालून तो सन २०१८-१९ या वर्षात करण्यात आलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून भागविण्यात यावा. यासाठी आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अटीच्या अधिन राहून प्रशासकिय मान्यता प्रदान करण्यास दर्शविण्यात आलेल्या सहमतीस अनुलक्षून काढण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०२२०१५३७२१९६२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवांने.

DINGLE DINESH RAMCHANDRA

Digitally signed by DINGLE DINESH RAMCHANDRA
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=8612f2011cf8cde3b074d561cd711c17c6c3fd836467a8648a8d21dc84bc01be, postalCode=400032, street=151 ANNEX,1ST FLOOR,MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=fc344849650ce07c3f9adc7e2cd4976b2852065e2acd65f7cee1828c10091458, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL JUSTICE DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=DINGLE DINESH RAMCHANDRA
Date: 2019.02.20 15:38:53 +05'30'

**(दि.रा.डिंगळे)**

सह सचिव , महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग, नागपूर.
३. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर.
४. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्रमांक २, गोंदिया.
५. श्रीमती अ. वि. खरे, वास्तुशास्त्रज्ञ, उप मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांचे कार्यालय, नागपूर.
६. सहाय्यक अभियंता श्रेणी- I,सार्वजनिक बांधकाम उप विभाग, अर्जुनी मोरगांव, जि. गोंदिया.
७. सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण, गोंदिया.

८. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारती-२), मंत्रालय, मुंबई.
९.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) -२, महाराष्ट्र, नागपूर.
१०. महालेखापाल (लेखापरिक्षा) -२, महाराष्ट्र, नागपूर.
११.संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१२.कक्ष अधिकारी (विनिमय / व्यय-१५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प/विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय,
१४.निवड नस्ती /अजाक.